शासकीय परिवहन सेवेतील वाहन चालकांना
मोटार परिवहन कामगार अधिनियम-१९६१
लागु करणेबाबत--

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**

शासन निर्णय क्रमांक : शापसे -१००२/(प्र.क्र.६२/२००२) -२८-अ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २२ जून २०१०

वाचा - १. मा.कामगार न्यायालयाचे दिनांक २.५.१९८९ चे आदेश.
२. मा.उच्च न्यायालयाचे दिनांक १९ एप्रिल १९९५ चे आदेश.
३. मा.सर्वोच्च न्यायालयाचे अपील क्र.१२४३/१९९६च्या संदर्भात दिनांक २१ मार्च २००१ चे आदेश
४. शासन ज्ञापन सा.प्र.वि.क्र.शापसे -१००१/(प्र.क्र.९१/२००१)/ २८-अ, दिनांक २९ जानेवारी २००२
५. सा.प्र.वि. शासन ज्ञापन क्र.शापसे -१००१/(प्र.क्र. ९१/२००१)/ २८-अ, दिनांक ४ सप्टेंबर २००२
६. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा यांचे प त्र क्र. शापसे/ प्रशा-१/ ०२/२०८३, दिनांक २४ एप्रिल २००२
७. शासन निर्णय क्रमांक : शापसे १००२/(प्र.क्र.६१/२००२)/ २८-अ, दिनांक २७ ऑगस्ट २००३

**पार्श्वभूमी :-**

नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, मुंबई यांच्या कार्यालयातील मोटार परिवहन कामगार अधिनियम १९६१ (Motor Transport Worker Act.१९६१) मधील कलम २६ अनुसार अतिकालीक भत्ता मिळावा म्हणून कामगार न्यायालय मुंबई यांच्याकडे दि.२०/१०/१९८१ रोजी अर्ज केला होता. सदरची मागणी कामगार न्यायालयाने मान्य केली आहे. या कामगार न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी देखील शासकीय परिवहन सेवा, मोटार परिवहन उपक्रम (Motor Transport Undertaking ) आहे व सेवेत काम करणारे वाहन चालक मोटार परिवहन कामगार आहेत असा निर्णय मा.उच्च न्यायालयाने रिट अर्ज क्र.४१२३/१९८९ मध्ये दिलेला आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात सिव्हील ॲप्लीकेशन क्र.१२६४३/९२ दाखल करण्यात आले असता मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.२१/३/२००१ रोजी मा.उच्च न्यायालयाचा निर्णय कायम ठेवला. सदर बाबीचा साकल्याने विचार करुन शासन आता खालील निदेश देत आहे.

**शासन निर्णय :-**

शासकीय परिवहन सेवेतील वाहन चालकांना संदर्भाधीन दिनांक २७ ऑगस्ट २००३ च्या शासन निर्णयान्वये मोटार परिवहन अधिनियम १९६१ लागु करण्यांत आला असून त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१ लागू नाही असा निर्णय घेण्यांत आला आहे.

या शासन निर्णयाव्दारे उपरोक्त दिनांक २७ ऑगस्ट २००३ चा शासन निर्णय रद्द करण्यांत येत असून खालीलप्रमाणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे.

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या रिटपिटीशन क्र.२०६०२ संदर्भातील सिव्हील ॲप्लीकेशन क्र.१२६४३/९६ वरील दि.२१/३/२००१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार शासकीय परिवहन सेवा वरळी, मुंबई या कार्यालयातील वाहन चालकांना मोटार परिवहन कामगार अधिनियम १९६१ अनुसार अतिकालीक भत्ता देय राहील. तसेच, त्यांच्या अन्य सर्व सेवाशर्तीसाठी महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१ लागु राहील.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५४/ व्यय-४, दि. ८ जून, २०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाइटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००६२२१४४०५९००१** असा आहे.

महाराष्ट्राचें राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( रा.को.बोरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विशेष पोलीस महानिरिक्षक, मोटार परिवहन, महाराष्ट्र राज्य (पदसिध्द संचालक) शासकीय परिवहन सेवा, बॉडी गेट लाईन , औंध , पुणे-७
२) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, सर पोचखानवाला रोड, वरळी, मुंबई ४०० ०२५
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १, मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन क्रमांक २५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९) निवड नस्ती